**अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील गट-अ व गट-ब मधील अधिका-यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र.बदली-१०१४/प्र.क्र.५७/का-१४२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०६ एप्रिल, २०१५

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.३१/०१/२०१४
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.२०/०५/२०१४
३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/ कार्या.१२, दि.१९/०१/२०१५

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दि.३१/१०/२०१३ रोजी दिलेल्या निदेशांचे पालन करण्यासाठी शासन सेवेतील गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकारी/कर्मचा-यांच्या पदस्थापना, बदली याबाबत याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी संदर्भाधीन अनुक्रमांक-१ वरील शासन निर्णयान्वये विविध नागरी सेवा मंडळे स्थापन करण्याबाबत निर्णय घेण्यात आला होता. सदर शासन निर्णयास संदर्भाधीन अनुक्रमांक-२ वरील शासन निर्णयान्वये स्थगिती देण्यात आली होती. आता, संदर्भाधीन अनुक्रमांक-३ वरील शासन निर्णयान्वये सदरहू स्थगिती उठविण्यात आली आहे. त्यानुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) मधील अधिका-यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

या विभागाच्या अधिपत्याखालील अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील गट 'अ' व गट 'ब' मधील अधिका-यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी पुढीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (नियोजन) | अध्यक्ष |
| २ | संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय | सदस्य |
| ३ | सहसचिव/उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सदस्य |

३. सदरहू मंडळापुढे गट-`अ` व गट `ब` (राजपत्रित) पदांवर पदोन्नतीने/सरळसेवेने नियुक्तीसाठी विभागीय संवर्गवाटप, सामान्य प्रशासन विभाग (सेवा उपविभागाने),अंतिम केल्यावर त्या यादीतील अधिका-यांच्या पदस्थापनेचा प्रस्ताव विभागाकडून शिफारशींसह ठेवण्यात येईल.

४. बदल्यांबाबत शिफारशीसाठी प्रस्ताव नागरी सेवा मंडळासमोर ठेवताना, महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतुदींनुसार कार्यवाहीबाबत वस्तुस्थिती तसेच प्रस्तावित बदल्यांबाबतची पार्श्र्वभूमी/वस्तुस्थिती, नागरी सेवा मंडळाच्या निदर्शनास आणणे आवश्यक राहील.

५. गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील जिल्हास्तरावर बदलीपात्र कर्मचा-यांच्या बाबतीत जिल्ह्याबाहेर तसेच महसुली विभाग/परिमंडळ/संभाग/प्रादेशिक स्तरावर बदलीपात्र कर्मचा-यांच्या बाबतीत अन्य महसुली विभाग/ परिमंडळ/संभाग/प्रादेशिक कार्यालयामध्ये बदलीसाठी शिफारशीचे प्रस्ताव नागरी सेवा मंडळ (१) समोर ठेवणे आवश्यक राहील.

६. पदस्थापनेच्या प्रस्तावावर नागरी सेवा मंडळाकडून शिफारस झाल्यावर, शिफारशीनुसार प्रस्ताव प्रशासकीय विभागाने सक्षम प्राधिका-यास आणि प्रादेशिक विभागप्रमुखांनी विभागप्रमुख यांना मान्यतेसाठी सादर करावा. त्यावर अंतिम निर्णय सक्षम प्राधिका-याकडून घेण्यात येईल.

७. बदलीसाठीच्या प्रस्तावावर नागरी सेवा मंडळाकडून शिफारस झाल्यावर प्रशासकीय विभागाने/विभागप्रमुखांनी, प्रस्ताव महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियमातील तरतुदीनुसार उचित सक्षम प्राधिका-यास मान्यतेसाठी सादर करावा. त्यावर अंतिम निर्णय संबंधित प्राधिका-याकडून घेण्यात येईल.

८. बदल्यासंबंधीच्या प्रस्तावावर, महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०४०६१२४६०६४२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Purushottam Hirlekar

Digitally signed by Tushar Purushottam Hirlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400067, st=Maharashtra, cn=Tushar Purushottam Hirlekar
Date: 2015.04.06 13:21:37 +05'30'

( तु.पु.हिर्लेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती.
५. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
६. उपसचिव (आस्थापना), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. सहसचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती.
९. उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, अमरावती.
१०. सामान्य प्रशासन विभाग (का.१२), मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (का-१४२७).